**राज्यातील ज्येष्ठ नागरिकांप्रती संवेदनशीलता (SensItization) बाळगण्याबाबत व त्यांना सौजन्याची वागणूक देण्याबाबत तसेच ज्येष्ठ नागरिक कायदा व नियम या अनुषंगाने जाणीव जागरुकता निर्माण करण्यासाठी प्रशिक्षण (Training) आयोजित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन परिपत्रक क्र.: ज्येष्ठना -२०२०/प्र.क्र. ७६/सामासु**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक १५ फेब्रुवारी, २०२०

**संदर्भ:** १) आई-वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याण अधिनियम, २००७
२) आई-वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याण नियम, २०१०
३) राज्याचे ज्येष्ठ नागरिक धोरण २०१३
४) शा.नि., सा.न्या.व वि.स.विभाग क्र. ज्येष्ठना २०१६/प्र.क्र.७१/सामासु, दि. ९ जुलै, २०१८

**प्रस्तावना :**

आई-वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याण अधिनियम,२००७ मधील प्रकरण ५, कलम २१ (दोन) अंतर्गत केंद्र व राज्य शासनाचे अधिकारी, पोलीस अधिकारी तसेच न्यायिक सेवांमधील सदस्य यांचेसाठी या अधिनियमाशी संबंधित प्रश्नांच्या बाबतीत संवेदना जागृती (sensitization) व जाणीव जागृती (Awareness) निर्माण करण्याच्या दृष्टीने नियतकालिक प्रशिक्षण आयोजित करण्यात येईल, अशी तरतूद आहे.

त्याचप्रमाणे जनहित याचिका क्र. ७६/२०१३- मिशन जस्टीस वि. भारत सरकार व इतर या न्यायालयीन प्रकरणी मा. न्यायालयाने दि. २२ जानेवारी,२०२० रोजी दिलेल्या आदेशानुसार पुढीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**परिपत्रक-**

भारताच्या संविधानातील राज्य धोरणांची निदेशक तत्वातील अनुच्छेद ३९- क व ४१ मधील तरतूदी लक्षात घेऊन, ज्येष्ठ नागरिकांना वृध्दापकाळ चांगल्या त-हेने घालविता यावा, समाजामध्ये त्यांचे जीवन सुसहय व्हावे, शारिरीक/मानसिक आरोग्य सुस्थितीत रहावे, वृध्दापकाळामध्ये त्यांच्या आर्थिक क्षमता, कामाचा हक्क, शिक्षणाचा हक्क आणि सार्वजनिक मदत मिळविण्यासाठी राज्य शासनाने राज्याचे ज्येष्ठ नागरिक धोरण, २०१३ जाहिर केले आहे. या धोरणात घालून दिलेल्या तत्वांचे तसेच आई-वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याण अधिनियम,२००७ मधील तरतूदींचे पालन करणे आवश्यक आहे.

२. यास्तव, शासकीय व निमशासकीय कार्यालयातील ज्येष्ठ नागरिकांच्या समस्या प्रकरणी शीघ्र कार्यवाही होण्यासाठी विशेष प्राधान्य द्यावे. ज्येष्ठ नागरिकांकडून त्यांच्यासंदर्भात जर काही तक्रारी/विनंती अर्ज इत्यादी प्राप्त झाल्यास संबंधित शासकीय कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांनी त्या ज्येष्ठ नागरिकांना योग्य ते मार्गदर्शन करावे. तसेच त्यांना सौजन्याची वागणूक देऊन त्यांच्या अडीअडचणी सोडविण्याच्या दृष्टीने आवश्यक ते सहकार्य करावे. त्यांना सन्मानाची वागणूक देऊन त्यांचे काम तत्परतेने होईल या दृष्टीने आवश्यक ती खबरदारी घ्यावी.

ज्येष्ठ नागरिकांनी दूरध्वनीद्वारे माहिती विचारल्यास अथवा चौकशी केल्यास त्यांना यथोचित माहिती द्यावी. शासकीय कार्यालयामध्ये भेटीसाठी आलेल्या अभ्यागतांमध्ये ज्येष्ठ नागरिकांना प्राधान्य द्यावे. याबाबतीत टाळाटाळ किंवा हलगर्जीपणा दिसून आल्यास संबंधित अधिकारी/कर्मचारी यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी.

३. ज्येष्ठ नागरिकांचे प्रश्न अतिशय व्यापक व त्यांचे विविध पैलू असल्यामुळे त्यांचे प्रश्न सोडविण्यासाठी राज्य शासनाच्या सर्व विभागातील तसेच अधिनस्त कार्यायालयाच्या आस्थापनांनी त्यांच्या अधिनस्त अधिकारी, पोलीस अधिकारी तसेच न्यायिक सेवांमधील सदस्य यांचेसाठी ज्येष्ठ नागरिकांच्या प्रश्नासंबंधी संवेदना जागृती (sensitization) व जाणीव जागृती (Awareness) बाबतचे नियतकालिक प्रशिक्षण/कार्यशाळा आयोजित कराव्यात.

अशा नियतकालिक प्रशिक्षण सत्रांमध्ये/कार्यशाळेत जिल्हाधिकारी, संबंधित विभागातील वरिष्ठ पोलीस अधिकारी, स्वयंसेवी संस्था व ज्येष्ठ नागरीकांच्या संघटना यांचा सहभाग असावा. स्वयंसेवी संस्था व जिल्हा विधी सेवा प्राधिकरणाने याबाबतीत पुढाकार घेऊन ज्येष्ठ नागरिक कायद्याबद्दल जागरुकता निर्माण करणे आवश्यक आहे. सदर प्रशिक्षण जिल्हा विधी सेवा प्राधिकरणाच्या सहकार्याने राबविण्यात यावे. तसेच याचे समन्वयन सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी करावे.

४. त्याचप्रमाणे अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठीच्या इतर प्रशिक्षणाच्या अभ्यासक्रमामध्ये ज्येष्ठ नागरिकांना द्यावयाच्या सौजन्यपूर्ण वागणुकीसंबंधी अधिकारी/कर्मचारी यांनी कार्यवाही करणे कसे आवश्यक आहे, याबाबतच्या प्रशिक्षणाचा समावेश करावा.

५. सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना विनंती करण्यात येते की, वरील सूचना त्यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या विभाग/तालुका/जिल्हा पातळीपर्यंतच्या कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या निदर्शनास आणून या सूचनांचे संबंधितांकडून काटेकोरपणे पालन होईल याची कृपया दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००२१८१७२००२८०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY GIRIDHAR PATIL

Digitally signed by SANJAY GIRIDHAR PATIL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0f7d1eee7567d430eefd928eefa78ed2a6072c4ce8f3c0aa4efaf26d9c32daeb, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=bd10fe5a55495bc381e7b4d4b658250c74eb3f55113a21fd21c8620f04c2c257, ou=SOCIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY GIRIDHAR PATIL
Date: 2020.02.18 17:22:58 +05'30'

(सं.गि.पाटील)

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री/राज्यमंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
६. शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.प्रधान सचिव, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानमंडळ, मुंबई
८. मा. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर
९. मा. महालेखापाल (लेखा वअनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर
१०.सर्व विभागीय आयुक्त (महसूल)
११.आयुक्त, समाजकल्याण, पुणे
१२.जिल्हाधिकारी (सर्व)
१३.सर्व प्रादेशिक उपायुक्त (समाजकल्याण विभाग)
१४.सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
१५.सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
१६.सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.निवड नस्ती, सामासु

------------